# जिव्हेचे रक्षण

लेखक
**बिन्तुल इस्लाम**

अनुवादक
**शाहजहान मगदुम**

# अनुक्रमणिका

॥ अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व अत्यंत कृपावंत आहे ॥

# परिचय

'जिव्हेचे रक्षण' ही इस्लामी शिष्टाचाराच्या शृंखलेतील तिसरी पुस्तिका आहे. यापूर्वी 'संयम' व 'क्षमा' या दोन पुस्तिका प्रकाशित झाल्या आहेत. इस्लामने शिक्षापात्र अपराध ठरविलेले अनेक प्रकारचे वाईट कर्म जिव्हेद्वारेच केले जातात. त्यामुळे जिव्हेचे रक्षण अत्यंत आवश्यक आहे, कारण केवळ तिच्या संरक्षणामुळेच मानव त्या सर्व अपराधांपासून वाचू शकतो ज्यांचे माध्यम जिव्हाच असते. या शृंखलेतील इतर पुस्तिकांप्रमाणेच या पुस्तिकेमध्येदेखील जे काही म्हटले जाते त्याच्या प्रमाणबद्धतेसाठी कुरआनमधील एखाद्या आयतीचा किंवा हदीसचा संदर्भ अवश्य दिला जावा, याबाबत सावधगिरी बाळगण्यात आली आहे. इतकेच काय या पुस्तिकेचा मोठा भाग हदीसवचनांवरच आधारित आहे. हदीसींचे भाषांतर करतानादेखील त्यात सांगण्यात आलेल्या मूळ कथनाचा योग्य भाव व्यक्त होईल आणि स्पष्ट भाव व्यक्त होणाऱ्या हदीसी सादर होतील याकडे कटाक्षाने लक्ष देण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे.

माननीय अनस बिन मालिक (रजि.) यांच्या निवेदनानुसार, अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले आहे, "खोटे बोलणे सोडून देणाऱ्याकरिता स्वर्गाच्या कडेला घर बनविले जाईल आणि सत्यवादी असूनदेखील भांडला नाही त्याकरिता स्वर्गाच्या मधोमध घर बनविले जाईल आणि आपल्या आचरणात सुधारणा करणाऱ्याकरिता स्वर्गाच्या वरच्या भागात घर बनविले जाईल." *(हदीस : तिर्मिजी)*

मुस्लिमांना देण्यात आलेल्या काही मौल्यवान धार्मिक पद्धतींच्या शिकवणींवर श्रद्धा बाळगणे त्यांच्याकरिता अनिवार्य आहे आणि त्यांच्यावर आचरण करण्यास आवश्यक असलेल्या काही उपासना अनिवार्य करण्यात आल्या आहेत, त्याचबरोबर त्यांना अत्यावश्यक नैतिक शैली प्रदान करण्यात आली आहे जेणेकरून त्यांनी स्वत:स त्यात झोकून द्यावे आणि त्यानुसार आचरण करता यावे. जेव्हा लोकांना इस्लामी शिष्टाचारांचा अवलंब करण्यास सांगण्यात आले तेव्हा 'इस्लामी शिष्टाचार काय आहेत हे आम्हाला सांगा,' असे उत्तर मिळाले. इस्लामी शिष्टाचाराच्या शृंखलेतील या पुस्तिका लिहिल्या जाऊ लागल्या आहेत. इस्लामी शिष्टाचारावर एक मोठे पुस्तक तयार करण्याऐवजी एकेका इस्लामी शिष्टाचरणावर एक पुस्तिका तयार करणे उचित वाटले.

**- बिन्तुल इस्लाम**

# जिव्हेचे रक्षण

एकदा माननीय अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.) प्रवास करीत होते. वाटेत त्यांना एका झाडाखाली म्हातारी दिसली. ती अतिशय त्रस्त वाटत होती. माननीय अब्दुल्लाह (रजि.) तिच्याजवळ गेले आणि म्हणाले,

"अस्सलामु अलैकुम व रहमतुल्लाह!" (तुमच्यावर अल्लाहची शांती आणि कृपा असो.)

म्हातारीने उत्तरादाखल कुरआनच्या आयतीचे पठण केले,

*"परमकृपाळू पालनकर्त्याकडून त्यांना सलाम सांगितला गेला आहे."*
*(दिव्य कुरआन-३६:५८)*

माननीय अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.)म्हणाले,

"अल्लाह तुमच्यावर कृपा करो, आपण इथे काय करीत आहात?"

तिने उत्तरादाखल पुन्हा कुरआनच्या आणखी एका आयतीचे पठण केले,

*"ज्याला अल्लाहने मार्गदर्शनापासून वंचित केले त्याच्याकरिता मग कोणीच मार्गदर्शक नाही, आणि अल्लाह त्यांना दुर्वर्तनातच भटकलेल्या अवस्थेत सोडून देतो."* *(दिव्य कुरआन-७:१८६)*

अर्थ असा होता, 'मी वाट चुकली आहे.'

माननीय अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.)यांनी विचारले,

"तुम्ही कुठे चालला आहात?"

म्हातारीने स्पष्टपणे एखाद्या स्थळांचे नाव न घेता पुन्हा कुरआनच्या आयतीचे पठण केले,

*"पवित्र आहे तो जो घेऊन गेला एका रात्री आपल्या भक्ताला मस्जिदेहराम (काबा मस्जिद) पासून दूरच्या त्या मस्जिदपर्यंत जिच्या वातावरणाला त्याने समृद्धी दिली आहे जेणेकरून त्याला आपल्या काही संकेतांचे निरीक्षण घडवावे."* *(दिव्य कुरआन-१७:१)*

याचा अर्थ असा होतो, 'मी मक्केहून बैतुल मक्दिसकडे (पॅलेस्टाईन) जात आहे.'

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांनी पाहिले की ही महिला कोणत्याही प्रश्नाचे उत्तर सामान्य भाषेत देत नव्हती, तर प्रत्येक प्रश्नाच्या उत्तरादाखल कुरआनच्या अशा आयतीचे पठण करीत होती ज्यातून त्या प्रश्नाचे उत्तर प्रकट होत असे.

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांनी विचारले,

"आपण केव्हापासून इथे आहात?"

*"सतत तीन दिवसी..."* *(दिव्य कुरआन-१९:१०)*

अर्थात- 'सतत तीन दिवसांपासून इथे बसले आहे.'

माननीय अब्दुल्लाह (रजि.) म्हणाले,

"तुमच्याजवळ खाण्या-पिण्याची वस्तु तर नाही, मग तुम्ही हा कालावधी कसा व्यतीत केला?"

महिलेने उत्तर दिले,

*"तो मला खाऊ-पिऊ घालतो."* *(दिव्य कुरआन-२६:७९)*

अर्थात- अल्लाह कोणत्यान् कोणत्या मार्गाने उपजीविका पोहचवितो.

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांनी विचारले,

"तुम्ही वुजू कशाने करता?"

*"मग पाणी उपलब्ध झाले नाही तर स्वच्छ मातीचा उपयोग करा आणि ती आपल्या चेहऱ्या व हातावर फिरवा (तयम्मुम करा)."*

*(दिव्य कुरआन-४:४३)*

अर्थात- 'माझ्याजवळ पाणी नसल्यामुळे मी तयम्मुम करते.'

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांनी तिला भोजन देऊ केले आणि म्हटले,

"हे खाऊन घ्या."

यावर ती म्हणाली,

*"मग रात्रीपर्यंत आपला उपवास (रोजा) पूर्ण करा."*

*(दिव्य कुरआन-२:१८७)*

अर्थात- 'मी रोजाधारक आहे.'

माननीय अब्दुल्लाह (रजि.) म्हणाले,

"सध्या रमजान महिना नाही."

यावर तिने उत्तर दिले,

*"जो कोणी स्वेच्छेने सत्कर्म करील तर निसंशय अल्लाहला त्याचे ज्ञान आहे आणि तो गुणग्राहकही आहे."* *(दिव्य कुरआन-२:१५८)*

'माझा अनिवार्य नसलेला रोजा आहे.' असे त्या महिलेचे म्हणणे होते.

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांनी विचारले,

"मात्र सफर महिन्यात रोजा सोडण्याची (इफ्तार करण्याची) परवानगी आहे."

वृद्ध महिलेने उत्तर दिले,

*"परंतु जर तुम्ही जाणलेत तर तुमच्यासाठी हेच अधिक उचित आहे की तुम्ही उपवास करावा."* *(दिव्य कुरआन-२:१८४)*

माननीय अब्दुल्लाह (रजि.) म्हणाले,

"तुम्ही माझ्यासारखे साधारण भाषेत का बोलत नाही?"

वृद्ध महिलेने उत्तर दिले,

*"कोणताही शब्द त्याच्या तोंडातून असा निघत नाही ज्याला सुरक्षित करण्यासाठी एक विद्यमान निरीक्षक हजर नाही."* *(दिव्य कुरआन-५०:१८)*

म्हातारीच्या बोलण्याचा अर्थ असा होता की 'माणूस जे काही बोलतो, त्याचा अल्लाहसमोर जाब द्यावा लागणार आहे आणि एखादा चुकीचा शब्द माझ्या मुखाद्वारे बाहेर पडू नये म्हणूनच मी कुरआनच्या जिव्हेतच बोलते.'

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांनी विचारले,

"तुमचा संबंध कोण्त्या कबिल्याशी आहे?"

महिलेने उत्तरादाखल परत कुरआनची आयत पठण केली,

*"एखाद्या अशा गोष्टीमागे लागू नका जिचे तुम्हाला ज्ञान नसेल. निश्चितच डोळे, कान व हृदय या सर्वांच्याकडे जाब विचारला जाईल."*
*(दिव्य कुरआन-१७:३६)*

अर्थात- माझ्या कबिल्याचे नाव जाणून तुम्ही काय करणार?

अब्दुल्लाह यांनी खेद व्यक्त करीत म्हटले,

"माझ्याकडून चूक झाली, मला क्षमा करावी."

महिलेने क्षमा करीत म्हटले,

*"आज तुमची कसलीच पकड नाही. अल्लाह तुम्हाला क्षमा करो,"*
*(दिव्य कुरआन-१२:९२)*

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांनी मदत करण्याची इच्छा व्यक्त करीत म्हटले,

"ही माझी सांडणी आहे, इच्छा असेल तर तुम्ही हिच्यावर स्वार होऊ शकता. मी तुम्हास तुमच्या इच्छित स्थळी पोहोचवितो."

म्हातारीने त्यांची मदत स्वीकारली आणि आभार व्यक्त करण्यास्तव कुरआनची ही आयत पठण केली,

*"तुम्ही जे काही पुण्यकर्म कराल, त्याचे अल्लाहला पूर्ण ज्ञान आहे."*
*(दिव्य कुरआन-२:१९७)*

अर्थात- 'अल्लाह तुम्हास या पुण्याचा निश्चितच मोबदला देईल.'

माननीय अब्दुल्लाह (रजि.) म्हणाले,

"ठीक आहे. मग या सांडणीवर स्वार व्हा."

असे म्हणत त्यांनी तिच्यासमोर सांडणी बसविली.

ती महिला म्हणाली,

*"श्रद्धावंतांना सांगा की आपल्या नजरा खाली ठेवा."*

*(दिव्य कुरआन-२४:३०)*

*"पवित्र आहे तो ज्याने आमच्यासाठी या गोष्टी अधीन केल्या. एरव्ही आम्ही यांना ताब्यात आणण्याचे सामर्थ्य बाळगत नव्हतो."*

*(दिव्य कुरआन-४३:१३)*

हे ऐकून अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.) यांनी आपले डोळे बंद केले. म्हातारी सांडणीवर बसू लागली तेव्हा सांडणी दचकली आणि म्हातारीचे कपडे सांडणीच्या

पाठीवरील लाकडी सांगाड्यात अडकले. त्यावर ती म्हणाली,

*"तुम्हा लोकांवर जे जे कोणते संकट आले आहे, ते तुम्ही स्वतःच ओढवलेले आहे."* *(दिव्य कुरआन-४२:३०)*

त्यानंतर माननीय अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.) यांनी सांडणीचे गुडघे बांधले आणि म्हातारी तिच्यावर स्वार झाली. आता इब्ने मुबारक यांनी सांडणीची वेसन हातात धरली आणि मोठ्या आवाजात (अरबचे उंटवाले प्रवासात म्हणतात ते) काव्य म्हणत सांडणीला भरभर चालवू लागले. यावर म्हातारी म्हणाली,

*"आपल्या चालीत मध्यमपणा राख आणि आपला आवाज थोडा धिमा ठेव."* *(दिव्य कुरआन-३१:१९)*

हे ऐकून अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.) धिम्या चालीत चालू लागले आणि धिम्या आवाजात काव्य करू लागले. यावर म्हातारीने परत एकदा कुरआनची आयत पठण केली,

*"सुलभतेने जितका कुरआन वाचू शकता वाचत जा."*

*(दिव्य कुरआन, ७३:२०)*

अर्थात- काव्य म्हणण्याऐवजी कुरआनचे पठण करावे.

काही अंतर पुढे गेल्यानंतर माननीय अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.) यांनी त्या महिलेस विचारले,

"तुमचे पती आहेत काय...?"

यावर ती म्हणाली,

*"हे श्रद्धावंतांनो, अशा गोष्टी विचारीत जाऊ नका ज्या तुम्हासमोर उघड केल्या गेल्या तर तुम्हाला त्या वाईट वाटतील." (दिव्य कुरआन-५:१०१)*

अर्थात- या प्रश्नाची आवश्यकताच नाही.

यावर माननीय अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.) स्तब्ध झाले आणि चालता-चालता एका काफिल्यात मिळाले. त्यांनी म्हातारीस विचारले,

"या काफिल्यात तुमचा कुणी नातलग आहे काय...?"

तिने उत्तर दिले,

*"ही मालमत्ता व ही संतती केवळ ऐहिक जीवनाची हंगामी शोभा आहे."* *(दिव्य कुरआन-१८:४६)*

अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.) यांच्या लक्षात आले की या काफिल्यात तिची मुले आहेत, म्हणून त्यांनी विचारले,

"तुम्ही त्यांची काही ओळख दाखविली तर मी त्यांना शोधून काढतो."

महिला म्हणाली,

*"त्याने जमिनीत मार्ग दाखविणारी चिन्हे ठेवली आणि नक्षत्रांपासूनदेखील लोक मार्गदर्शन प्राप्त करतात."* *(दिव्य कुरआन-१६:१६)*

तिच्या सांगण्याचा अर्थ असा होता की तिचे मुलगे काफिल्याचे सरदार आहेत.

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांनी त्यांची नावे विचारली तेव्हा ती म्हणाली,

*"आणि अल्लाहने इब्राहीम (अ.) यांना आपला मित्र बनविला होता...."* *(दिव्य कुरआन-४:१२५)*

*"अल्लाहने मूसा (अ.) यांच्याशी अशाप्रकारे बातचीत केली ज्या रीतीने बातचीत केली जाते."* *(दिव्य कुरआन-४:१६४)*

*"हे याहया! ईशग्रंथाला भक्कमपणे धारण कर."*

*(दिव्य कुरआन-१९:१२)*

माननीय अब्दुल्लाह (रजि.) (समजून चुकले की म्हातारीच्या मुलांची नावे इब्राहीम, मूसा आणि याहया आहेत म्हणून) त्या मुलांची नावे घेऊन हाक देऊ लागले. ही हाक ऐकताच काफिल्यातून तीन युवक बाहेर आले. त्यांनी त्यांच्या आईस सांडणीवरून खाली उतरविले आणि अब्दुल्लाह (रजि.) यांना भेटले.

म्हातारी आपल्या मुलांकडे वळून त्यांना म्हणाली,

*"आता आपल्यापैकी एखाद्याला चांदीचे हे नाणे देऊन शहरात पाठवू या आणि त्याने पाहावे की सर्वांत उत्तम जेवण कोठे मिळते. तेथून त्याने काहीतरी खावयास आणावे."* *(दिव्य कुरआन-१८:१९)*

म्हातारीचा उद्देश असा होता की अब्दुल्लाह (रजि.) यांना भोजन आणून द्यावे. त्यांच्यापैकी एक युवक उठून धावतच शहराकडे गेला आणि भोजन आणून माननीय इब्ने

मुबारक (रजि.) यांच्यासमोर ठेवले. ती म्हातारी महिला माननीय इब्ने मुबारक (रजि.) यांना म्हणाली,

*"मजेत खा आणि प्या आपल्या त्या कृत्यांच्या मोबदल्यात जी तुम्ही गत दिवसांत केली आहेत."* *(दिव्य कुरआन-६९:२४)*

अब्दुल्लाह बिन मुबारक (रजि.) यांना खूप आश्चर्य वाटले की या वृद्ध महिलेस कुरआनचा किती दांडगा अभ्यास आहे. तिच्या मुलांनी सांगितले की मागील चाळीस वर्षांपासून आमची आई कुरआनच्या आयतीशिवाय एक शब्दसुद्धा बोलली नाही. कारण तिला भय वाटते की तिच्या तोंडून असा कोणताही शब्द बाहेर पडू नये ज्यामुळे अंतिम निवाड्याच्या दिवशी अल्लाहसमोर तिला जाब द्यावा लागेल.

यावरून जिव्हेच्या रक्षणाच्या बाबतीत हा उच्च स्तर आम्हा सर्वसामान्य लोकांच्याच नव्हे तर मोठमोठ्या विद्वानांच्यादेखील आवाक्याबाहेरची गोष्ट असल्याचे स्पष्ट होते. तरीही ज्या लोकांच्या मनात स्वत:ला अपराधांपासून वाचविण्याची दृढ भावना उत्पन्न होते ते या स्तरापर्यंतदेखील जाऊन पोहोचतात. हाच ही कथा सादर करण्यामागील उद्देश आहे.

खरे तर मानव जे काही अपराध करतो त्यांच्यापैकी अनेक अपराध जिव्हेच्या माध्यमातूनच घडत असतात.

माननीय मआज बिन जबल (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

मी एका प्रवासात पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासोबत होतो. एकेदिवशी जेव्हा आम्ही चालत होतो, मी पैगंबरांच्या जवळ गेलो आणि त्यांना म्हणालो,

"हे पैगंबर! मला आपण असे कर्म सांगावे ज्यामुळे स्वर्गप्रवेश सुलभ व्हावा आणि नरकाग्नीपासून बचाव व्हावा."

यावर पैगंबर म्हणाले,

"तुम्ही तर खूपच महत्त्वपूर्ण प्रश्न विचारला. मात्र अल्लाह ज्याकरिता सोपे करील त्याला हे सहज शक्य आहे. याकरिता तुम्ही ईश्वराची भक्ती करा, त्याच्याबरोबर कोणासही वाटेकरी ठरवू नका. नमाज कायम करा आणि जकात अदा करा. रमजान महिन्यात अनिवार्य रोजे ठेवा आणि हजयात्रा करा."

एवढे बोलून पैगंबर पुढे म्हणाले,

"आता मी कल्याणकारी मार्गाकडे तुमचे मार्गदर्शन करावे काय? (नीट लक्ष देऊन ऐका) रोजा हा ढाल आहे (अर्थात अपराधापासून वाचवितो) आणि ईशमार्गात खर्च करणे (असे पुण्यकर्म आहे ज्यामुळे) अल्लाह घडलेले अपराध अशा प्रकारे विझवितो जसे पाणी आग विझविते, त्याचप्रमाणे मध्यरात्री अदा करण्यात येणारी नमाजसुद्धा अपराधांची क्षमा मिळवून देते."

यानंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी कुरआनची ही आयत पठण केली,

*"मूर्तीसारख्या घृणास्पद गोष्टींपासून अलिप्त राहा. खोट्या गोष्टी वर्ज्य करा. एकाग्र होऊन अल्लाहचे दास बना." (दिव्य कुरआन-२२:३०-३१)*

मग पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले,

"आता मी संपूर्ण जीवनपद्धतीच्या आदेशांमधील (अनुसरण) सरदार आणि त्यांचा स्तंभ व उंची स्पष्ट करून सांगू काय?"

मी म्हणालो, "अवश्य सांगा, हे पैगंबर!"

पैगंबर म्हणाले,

"जीवनपद्धतींमध्ये सरदार (प्रमुख) इस्लाम आहे आणि त्याचा स्तंभ नमाज आणि त्याची उंची जिहाद आहे."

यानंतर पैगंबरांनी म्हटले,

"मी तुम्हाला या समस्त प्रकरणाचा सर्वांत महत्त्वपूर्ण भाग कोणता आहे ते सांगू काय?"

मी म्हणालो, "अवश्य सांगा, हे पैगंबर!"

पैगंबरांनी आपली जिव्ह हातात धरून म्हटले,

"हिला रोखा...."

मी म्हणालो, "हे पैगंबर! म्हणजे या जिव्हेद्वारे (मुखाने) चुकीचे शब्द निघाले तर अल्लाह आमची पकड करील काय?"

पैगंबर मुहम्मद (स.) स्नेहभावाने म्हणाले,

"हे मआज! तुझ्यावर तुझ्या आईस रडू कोसळावे (म्हणजे तुम्हाला काय झाले आहे, एवढी क्षुल्लक गोष्ट तुम्ही समजू शकला नाही), लोकांची हीच जिव्हा त्यांना नरकाग्नीत पोहचविण्यास कारणीभूत ठरेल."

अशा (अभद्र) जिव्हेचे असंख्य प्रकार आहेत. उदाहरणार्थ, निंदा करणे, चुगली-चहाडी करणे, खोटा आरोप लावणे, खोटे बोलणे, अर्वाच्च बोलणे, टीका करणे, टिंगल-टवाळी करणे, अफवा पसरणे, उपहास करणे, तुच्छ लेखून बोलणे, बेअब्रू करणे, अपमानास्पद बोलणे, लाळघोटेपणा करणे, धिक्कारणे, मिरविणे, विलाप करणे वगैरे अपराध (अभद्र) जिव्हेद्वारेच घडत असतात. याव्यतिरिक्त ईर्ष्या, द्वेष, गर्व अथवा अहंकार यासारख्या आत्मिक रोगाचे प्रकटन जिव्हेच्याच माध्यमाने होते. जर मानवाने पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिकवणीनुसार आचरण केले तर निश्चितच या अपराधांपासून स्वत:चा बचाव करणे शक्य आहे.

जिव्हेचे रक्षण करणे किती आवश्यक आहे हे निम्नलिखित हदीसवचनांवरून स्पष्ट होते.

माननीय सुफियान बिन अब्दुल्लाह सक़फ़ी यांच्या निवेदनानुसार,

मी एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांना विनंती केली, "हे पैगंबर! मला एखादे असे कर्म सांगावे ज्यावर मी कसोशीने अंमलबजावणी करावी."

पैगंबर म्हणाले,

"तुम्ही सांगा, माझा पालनकर्ता केवळ अल्लाहच आहे आणि त्यावर कायम राहा."

मी म्हणालो, "हे पैगंबर! आपल्या दृष्टिकोनातून माझ्याकरिता कोणती गोष्ट सर्वांत जास्त घातक आहे?"

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपली जीभ पकडत म्हटले,

"ही...!" *(हदीस : तिर्मिजी)*

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"माणूस अशी वाणी बोलतो जिचे नुकसान किती मोठे आहे याचा त्यास अंदाज नसतो आणि याच कारणामुळे तो नरकाग्नीमध्ये इतक्या दूरवर जाऊन पडतो की ते अंतर पूर्व आणि पश्चिम यांच्या दरम्यानच्या अंतराएवढे असते." *(हदीस : मुस्लिम)*

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

"माणूस अशी वाणी बोलतो (आणि तिला इतकी क्षुल्लक समजतो की) ती बोलताना त्यास कसलेही वाईट वाटत नाही, (मात्र वास्तविपणे ती इतकी वाईट असते की) तिच्या मोबदल्यात सत्तर वर्षांपर्यंत आगीत कोसळत राहील." *(हदीस : तिर्मिजी)*

बिलाल बिन हारिस (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

"माणूस ईश्वरास प्रसन्न करणारी एखादी वाणी बोलतो, मात्र त्यास याची कल्पना नसते की (पुण्याईच्या दृष्टीने) हे किती महान कर्म आहे आणि याच (पुण्य) कर्मामुळे अल्लाह त्या माणसाकरिता जग अस्तित्वात असेपर्यंत आणि अंतिम निवाड्याच्या दिवसापर्यंत जेव्हा अल्लाहची प्रत्यक्ष भेट होणार असते, आपली प्रसन्नता लिहितो. त्याचप्रमाणे माणूस आपल्या जिव्हेद्वारे असा एखादा शब्द उच्चारतो जो अल्लाहला पसंत नसतो आणि माणसाला याची कल्पनासुद्धा नसते की (पापाच्या दृष्टीने) हे केवढे मोठे (कु) कर्म आहे आणि अल्लाह अंतिम निवाड्याच्या दिवसापर्यंत, ज्या दिवशी माणूस प्रत्यक्ष अल्लाहला सामोरे जाणार असतो, आपले नैराश्य लिहितो." *(हदीस : मुअत्ता)*

अशाच स्वरूपाचे एक निवेदन अबू हुरैरा (रजि.) यांचेदेखील आहे,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

"माणूस कुठलाही मागचा-पुढचा विचार न करता अविवेकीपणे एखादे वक्तव्य करतो आणि या अपराधास्तव तो नरकाग्नीत जाऊन पडतो आणि (अशाच प्रकारे) माणूस अजाणतेपणी एखादे वक्तव्य करतो आणि (ते इतके उत्तम असते की) त्यामुळे तो स्वर्गात प्रवेश करतो." *(हदीस : मुअत्ता)*

या हदीसवचनांवरून ही गोष्ट स्पष्ट होते की मुखावाटे निघणारे शब्द भल्या-बुऱ्या परिणामांना सामोरे जाण्यास भाग पाडतात. म्हणूनच वक्तव्य करण्यापूर्वी सद्सद्विवेक बुद्धी वापरावी अन्यथा भयानक परिणाम भोगावे लागतात!

माननीय अबू सईद खुदरी (रजि.) यांच्या निवदेनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

"सकाळ होते तेव्हा माणसाच्या शरीराचे सर्व अवयव जिव्हेसमोर विनंती करतात की आमच्या बाबतीत अल्लाहचे भय बाळग, कारण आम्ही तुझ्याशी संलग्न आहोत. तू उत्तम असशील तर आम्हीही उत्तम राहू आणि तू जर चुकीचा मार्ग अवलंबिला तर

आम्हालासुद्धा चुकीचा मार्ग अवलंबावा लागेल (आणि याचे दुष्परिणाम भोगावे लागतील)."

*(हदीस : तिर्मिजी)*

माननीय अबू अय्यूब (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

एक मनुष्य पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे आला आणि म्हणाला, "हे पैगंबर! मला एखादी गोष्ट शिकवा, मात्र ती थोडीच असावी."

पैगंबर म्हणाले,

"तुम्ही जेव्हा नमाजकरिता उभे राहाल तेव्हा अशी नमाज अदा करा जणू तुम्ही या जगाचा निरोप घेत आहात आणि कोणतीही अशी गोष्ट करू नका ज्यासाठी नंतर क्षमा मागावी लागेल आणि जे काही लोकांकडे आहे त्याबाबत निराशा व्यक्त करा."

*(हदीस : इब्ने माजा)*

माननीय उकबा बिन आमिर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

एकदा मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, "हे पैगंबर! मला मोक्ष कसा प्राप्त होईल?"

पैगंबर म्हणाले,

"तुम्ही आपल्या जिव्हेवर नियंत्रण ठेवा आणि तुमचे घर तुमच्याकरिता उघडे असावे आणि तुम्ही आपल्या अपराधांवर अश्रू गाळून पश्चात्ताप करावा."

*(हदीस : तिर्मिजी)*

माननीय आएशा (रजि.) यांच्याबाबतीत निवेदन आहे की त्या आपल्या कुटुंबियांना ईशाच्या (रात्रीच्या) नमाजनंतर संदेश पाठवत असत, "आता तरी तुम्ही लिहिणाऱ्या देवदूतांना (फरिश्त्यांना) विश्रांती देणार नाही काय?" *(हदीस : मुअत्ता)*

अर्थात- आता झोपी जा जेणेकरून तुमची वक्तव्ये आणि कर्म लिहिणाऱ्या देवदूतांना थोडी विश्रांती मिळेल.

माननीय उमर (रजि.) माननीय अबू बकर (रजि.) यांच्याकडे आले तेव्हा पाहिले की ते आपली जिव्हा ओढत होते.

माननीय उमर (रजि.) म्हणाले, "थांबा, अल्लाह तुम्हाला क्षमा करो, हे तुम्ही काय करीत आहात?"

यावर माननीय अबू बकर (रजि.) म्हणाले, "हिने मला विनाशाच्या ठिकाणी लोटले." *(हदीस : मुअत्ता)*

मुहम्मद शफी अनावश्यक गोष्टींच्या नुकसानीबाबत बोलताना म्हणतात, "माणूस जे काही कर्म करतो वा वक्तव्य करतो त्याचे तीन प्रकार असतात.

(१) लाभदायक - या जीवनात किंवा पारलौकिक जीवनात लाभ असेल.

(२) नुकसानकारक - या जीवनात किंवा पारलौकिक जीवनात नुकसान असेल.

(३) ना लाभ ना नुकसान - लाभही नाही नि नुकसानही नाही.

या तिसऱ्या प्रकाराला 'निरुद्देश' शब्दाचे नाव देण्यात आले आहे. परंतु सतर्कतेने विचार केल्यास लक्षात येते की हा तिसरा प्रकारदेखील वास्तविकपणे दुसऱ्या प्रकारात म्हणजेच 'नुकसानकारक'मध्येच मोडतो, कारण अशा कर्मात अथवा वक्तव्यात व्यतीत केली गेलेली वेळ अथवा त्या वेळेत एकदा 'सुब्हानल्लाह' (अल्लाह पवित्र आहे) म्हटले असते तर कर्मांचे पारडे अर्धे भरले असते. अन्य एखादे सत्कर्म केले असते तर अपराधांचे प्रायश्चित्त आणि मुक्तीचा मार्ग अथवा कमीतकमी या जगातील गरजांबाबतच्या निष्काळजीपणाचे कारण बनला असता. ही बहुमूल्य वेळ अनावश्यक कर्मांत किंवा अनावश्यक वक्तव्यात व्यतीत करणे म्हणजे जणू एखाद्यास अधिकार दिला जावा की त्याने हवे तर दागदागिने आणि सोन्या-चांदीचा खजिना घ्यावा अथवा मातीचा ढीग! जर त्याने खजिन्याऐवजी मातीचा ढीग उचलण्याचे मन बनविल्यास त्याचे नुकसान अगदी उघड आहे. *(गुनाह बे-लज्जत - मुहम्मद शफी)*

बे-लगाम वक्तव्याच्या नुकसानीच्या बाबतीत सदाचारी वयोवृद्धांची अनेक निवेदने वर्तविण्यात आली आहे-

* माननीय अबू बकर सिद्दीक (रजि.) सांगतात, "संकटाचे मूळ मनुष्याच्या वार्तालापात आहे."

* माननीय उस्मान (रजि.) सांगतात, 'जिव्हेचा अपराध पावलांच्या अपराधापेक्षा भयंकर असतो."

* माननीय अली (रजि.) यांचे निवेदन आहे, 'जिव्हा हे सोडले तर जिवावर उठणारे श्वापद आहे." ते पुढे म्हणतात, 'जिव्हेचा मनुष्यावर प्रभाव असणे हा आत्म्याचा अवमान होय."

जिव्हेचा बेताल वापर या जीवनाच्या आणि पारलौकिक जीवनाच्या दृष्टीने नुकसानकारक सिद्ध होतो आणि कधीकधी चुकीच्या पद्धतीने वापरण्यात आलेली जिव्हा, वापरणाऱ्यालाच संकटात टाकते अथवा त्याला लाभलेली किंवा लाभणार असणारी ईशदेणगी हिसकावले जाण्याचे माध्यम बनते.

माननीय अली (रजि.) सांगतात, "अनेक शब्द ईशदेणगी हिसकावतात." ते पुढे म्हणतात, "ज्या इसमाच्या जिव्हेचा त्याच्यावर प्रभाव असेल तीच त्याच्या अधोगतीचा व मृत्युचा निर्णय घेते."

ख्वाजा हसन बसरी म्हणतात, "बुद्धिवंताची जिव्हा हृदयाच्या मागे आहे. एखादे वक्तव्य करण्यापूर्वी तो हृदयाकडे वळतो आणि लाभदायक असलेले वक्तव्यच तो करतो. तसेच मूर्खाचे हृदय त्याच्या जिव्हेच्या टोकावर असते. तो हृदयाकडे वळत नसतो. जिव्हेवर आलेले सर्व बडबडतो."

अर्थात- श्रद्धावंताकरिता जिव्हेचे रक्षण करणे आणि आपल्या जिव्हेला अनावश्यक वक्तव्य करण्यापासून रोखणे अत्यंत आवश्यक आहे. त्यामुळे तो केवळ अनेक अपराधांपासून वाचत नसून अनेक मोठे पुरस्कार व पुण्यदेखील त्याला लाभतात.

मुअत्ता आणि सहीह बुखारी दोन्हींमध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांचे वक्तव्य आहे,

"जो मनुष्य जिव्हेच्या रक्षणाची हमी देतो, त्याला स्वर्गप्राप्ती होईल याची मी हमी देतो."

जिव्हेद्वारे होणाऱ्या अपराधांबाबत अवतरित झालेली कुरआनची वचने व हदीसवचने खालीलप्रमाणे आहेत.

# खोटेपणा

कुरआनमध्ये अल्लाहने सांगितले आहे,

*“मूर्तीसारख्या घृणास्पद गोष्टींपासून अलिप्त राहा. खोट्या गोष्टी वर्ज्य करा.”* *(दिव्य कुरआन, २२:३०)*

कुरआनात ‘सूरह मुअ्मिन’च्या आयत क्र. २८ मध्ये सांगितले आहे,

*“मर्यादा ओलांडणाऱ्या आणि अतिशय खोटे बोलणाऱ्या व्यक्तीचे मार्गदर्शन अल्लाह करीत नाही.”*

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, “सत्य पुण्याकडे मार्गदर्शन करते आणि पुण्य हे स्वर्गाची वाट दाखविते आणि माणूस सत्य बोलत राहतो इथपावेतो की ‘सिद्दीक’ (खरा) होतो. त्याचप्रमाणे असत्य हे निश्चितच दुराचाराकडे घेऊन जाते आणि दुराचार नरकाग्नीची वाट दाखविते, इथपावेतो की ईश्वरदरबारी ‘कज्जाब’ (महाखोटारडा) ठरतो.”

*(हदीस : बुखारी)*

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांनी कथन केलेल्या इस्लामपूर्व काळातील एका घटनेचा उल्लेख ‘सही बुखारी’ हदीसग्रंथात आढळतो. या घटनेचा संदर्भ अज्ञानकाळाशी असला तरी त्यावरून स्पष्ट होते की खोटी शपथ घेणे किती घातक आणि विध्वंसक ठरते.

माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांच्या निवेदनानुसार, बनू हाशिम परिवारातील एका माणसाला कुरैश परिवारातील एका माणसाने मजुरीवर ठेवले. तो त्याच्याबरोबर काही उंट घेऊन जात असताना हाशमी परिवारातील आणखी एका माणसाने त्यास टोपल्यास बांधण्यासाठी एक दोरी मागितली. हाशमी मजुराने मालकाची परवानगी न घेता उंट बांधण्याची एक दोरी त्यास देऊन टाकली. एके ठिकाणी मुक्काम पडला आणि सर्व उंटांना दावणीस बांधण्यात आले. मात्र एक दोरी कमी पडल्याने एक उंट मोकळाच राहिला.

मालकाने विचारले, “हा उंट का बांधला नाही?”

"याला बांधण्यासाठी दोरी नाही." हाशमी मजुराने सांगितले.

"याची दोरी कुठे आहे?" मालकाने विचारले.

दोरी दुसऱ्याला देऊन टाकली असल्याचे मालकास कळल्यावर तो भयंकर संतापला आणि रागाच्या भरात एक लाठी उचलून अविचाराने तिचा जोरदार प्रहार केला. यात तो हाशमी मजूर गंभीर जखमी झाला आणि जागेवरच घायाळ अवस्थेत पडला.

तिथून येमेनचा एक माणूस जात असताना त्या जखमी हाशमी मजुराने त्यास विचारले, "तुम्ही माझा एक निरोप नेऊन पोचवाल का?"

"होय! अवश्य पोचवीन." तो माणूस उत्तरला.

"तुम्ही जेव्हा हज करण्यासाठी मक्का शहरी जाल तेव्हा तेथे 'हे बनू हाशिम!' अशी हाक मारावी. कुणी प्रतिसाद दिला तर त्यांच्याकडे अबू तालिब यांना भेटण्याची इच्छा व्यक्त करा आणि अबू तालिब यांना सांगावे की त्या व्यक्तीने मला केवळ एका छोट्याशा दोरीसाठी ठार मारले." एवढे बोलून तो हाशमी मजूर दगावला.

यानंतर त्याचा मालक मक्का शहरी परतला आणि अबू तालिब यांना भेटला. त्यांनी मालकास विचारले, "आमच्या माणसाचे काय झाले?"

"तो आजारी पडला होता. मी त्याचे चांगल्या रितीने उपचार केले होते, मात्र तो दगावला. मी त्याचा दफनविधी केला."

काही दिवसांनंतर हजच्या कालावधीत तो येमेनी माणूस त्या मृत मजुराचा निरोप घेऊन तेथे आला आणि हाक दिली, "हे बनू हाशिम!"

"आम्ही इथे आहोत." असा प्रतिसाद मिळाला.

मग तो म्हणाला, "अबू तालिब कुठे आहेत?"

"हे आहेत अबू तालिब!" असे लोकांनी सांगितले.

तो अबू तालिब यांना भेटला. त्यांना त्या मेलेल्या मजुराचा संदेश दिला, "मला माझ्या मालकाने केवळ एका उंट बांधण्याच्या दोरीसाठी ठार मारले."

मग अबू तालिब त्या खून करणाऱ्या मालकाकडे गेले व म्हणाले, "मी तुमच्यासमोर तीन अटी ठेवतो. त्यापैकी तुम्ही कोणतीही एक अट मान्य करावी. पहिली अट अशी की

या खुनाच्या बदल्यात तुम्ही शंभर उंटांची खूनभरपाई द्यावी. कारण त्याचा खून तुम्हीच केला आहे. दुसरी अट अशी की तुमच्या परिवारातील ५० लोकांनी शपथपूर्वक सांगावे की हा खून तू केलेला नाहीस आणि तिसरी अट अशी की मृताच्या बदल्यात तुला आम्ही ठार करावे.''

हा खुनी मालक आपल्या कबिलेवाल्यांकडे आला आणि सर्व हकीकत सविस्तरपणे सांगितली. कबिलेवाले सर्वजण खोटी शपथ घेण्यास तयार झाले.

मात्र याच खुन्याच्या कबिल्यातील एक महिला (ती मूळची बनू हाशिम कबिल्याची. पण तिचा विवाह खुन्याच्या कबिल्यातील एका व्यक्तीशी झाला होता आणि तिचा मुलगा त्या पन्नास व्यक्तींमध्ये होता.) अबू तालिब यांच्याकडे आली आणि त्यांना विनंती केली,

''माझ्या मुलास शपथ घेण्यापासून मुक्त करावे.''

अबू तालिब यांनी तिची विनंती मान्य केली.

मग एक व्यक्ती अबू तालिब यांच्याकडे आली आणि म्हणाली,

''तुम्ही शंभर उंटांच्या बदल्यात पन्नास माणसांची शपथ ठेवली आहे. म्हणजेच एका माणसाच्या शपथेच्या तुलनेत दोन उंट. तुम्ही हे दोन उंट घ्या आणि मला शपथ घेण्यापासून मुक्त करा.''

अबू तालिब यांनी त्या व्यक्तीचीही विनंती मान्य केली.

उरलेल्या ४८ लोकांनी शपथपूर्वक खोटे सांगितले की आमच्या माणसाने त्या हाशमी मजुराचा खून केला नाही.

माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) ही घटना सांगून झाल्यावर म्हणाले, ''शपथ आहे त्या ईशसत्तेची जिच्या हाती माझा प्राण आहे, या घटनेच्या एका वर्षानंतर त्या ४८ लोकांपैकी एकही माणूस जीवित उरला नाही.''

माननीय अबू बकर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी तीनदा म्हटले, ''सर्वांत मोठे पाप कोणते आहे, ते मी तुम्हाला सांगू काय?''

''अवश्य सांगा हे अल्लाहचे पैगंबर !'' सोबत्यांनी म्हटले.

यावर पैगंबर म्हणाले, “ईश्वराबरोबर कुणासही भागीदार ठरविणे, माता-पित्याची अवज्ञा करणे आणि खोटे बोलणे.” *(हदीस : मुस्लिम)*

अरीम बिन फातिक (रजि.) यांचे निवेदन आहे,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ‘फज्र’ (पहाट) ची नमाज अदा केली. यानंतर ते उभे राहिले. त्यांनी तीनदा म्हटले, “खोटी साक्ष देणे ईश्वराबरोबर इतरांना भागीदार ठरविण्यासम पाप आहे.”

काही लोकांना प्रसिद्धीची प्रचंड हौस असते. वाक्‌चातुर्य दाखवित आपले कौतुक करून घेण्याच्या इच्छेपोटी खोटेनाटे काहीही बोलून लोकांना प्रभावित करण्याचा प्रयत्न करीत असतात. अशा लोकांकरिता कडक शब्दांत चेतावणी देण्यात आली आहे.

बिन हकीम (रजि.) यांनी त्यांच्या वडिलांनी आजोबांकडून ऐकलेल्या वक्तव्यानुसार निवेदन करताना म्हटले आहे,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, “विध्वंस आहे त्या लोकांसाठी जे लोकांना प्रभावित करण्यासाठी काहीही खोटे बोलतात त्यांच्याकरिता हे घातक आहे! घातक आहे!!” *(हदीस : तिर्मिजी)*

कधीकधी लहान मुलांना समजावण्याच्या अथवा त्यांना खोड्या करण्यापासून परावृत्त करण्याकरिता किंवा अशाच एखाद्या हेतूपोटी लोक अविवेकीपणाने खोटे बोलतात आणि त्यास खोटे समजतदेखील नाहीत. मात्र खोटे कोणत्याही स्थितीत खोटे असते, मग ते मोठ्यांद्वारे म्हटलेले असो वा लहान मुलांद्वारे.

माननीय अब्दुल्लाह बिन आमिर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) एके दिवशी आमच्या घरी बसले होते. इतक्यात माझ्या आईने मला बोलाविले आणि म्हणाली, “इकडे ये! मी तुला एक वस्तू देते.”

यावर पैगंबरांनी माझ्या आईस विचारले, “त्याला कोणती वस्तू देण्याचा तुमचा विचार आहे?”

माझ्या आईने सांगितले, “मी त्यास खजूर देईन.”

पैगंबरांनी म्हटले, “जर तुम्ही त्यास वस्तू देण्याचे सांगून काहीच दिले नसते तर हेदेखील खोटे बोलणे ठरले असते.” *(हदीस : अबू दाऊद)*

माननीय इब्ने उमर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले आहे, "जेव्हा अल्लाहचा दास खोटे बोलतो तेव्हा देवदूत (फरिश्ता) त्याच्या दुर्गंधीमुळे त्या माणसापासून एक मैल लांब जातो."
*(हदीस : तिर्मिजी)*

इमाम मालिक यांच्या निवेदनानुसार,

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) सांगत असत "(जेव्हा) अल्लाहचा दास खोटे बोलत असतो तेव्हा त्याच्या हृदयावर एक काळा ठिपका निर्माण होतो (आणि तो वाढत राहतो) इथपावेतो की संपूर्ण हृदय काळे पडते आणि अल्लाहच्या दरबारात खोटारड्यांच्या यादीत त्या मनुष्याची गणना केली जाते." *(हदीस : मुअत्ता)*

सफवान बिन सुलैम यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारण्यात आले, "मोमिन भित्रा असू शकतो काय?"

पैगंबर म्हणाले, "होय."

विचारण्यात आले, "मोमिन कंजूस असू शकतो काय?"

पैगंबर म्हणाले, "होय.

मग विचारण्यात आले, "मोमिन खोटारडा असू शकतो काय?"

यावर पैगंबर म्हणाले, "नाही...!" *(हदीस : मुअत्ता)*

मोमिन भित्रा असेल तरी काही हरकत नाही असा वरील हदीसचा अर्थ नसून या ठिकाणी खोटारडेपणाच्या अत्यंत वाईट स्थितीवरून सच्चा मुस्लिम कधीही खोटे बोलत नसतो, हे स्पष्ट करणे हा मूळ हेतू आहे. भित्रेपणा आणि कंजूसीबाबत बोलायचे झाले तर निश्चितच या दोन्ही गोष्टी वाईट आणि अयोग्य आहेत. होय, खोटारडेफणा त्यांच्यापेक्षा मोठा गुन्हा आहे आणि एका मोमिनच्या प्रतिष्ठेच्या अगदी विरूद्ध आहे.

एके रात्री पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अनेक लोकांना वेगवेगळ्या अपराधांपायी शिक्षा भोगताना पाहिले. त्यांच्यातील एका माणसाचा जबडा चिरला जात होता. नंतर पैगंबरांना सांगण्यात आले की हा माणूस खोट्या गोष्टी पसरवित होता आणि मग त्या सर्व

गोष्टी जगभर पसरत होत्या. पैगंबरांना असेही सांगण्यात आले की अंतिम निवाड्याच्या दिवसापर्यंत या माणसाला ही शिक्षा मिळतच राहील.

कधी कधी पतीचे लक्ष आपल्यावर अधिक आहे आणि तो आपल्याला जास्त काही देत असल्याचे भासवून सवती एकमेकांना मानसिक त्रास देतात.

माननीय अस्मा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

एका महिलेने पैगंबर मुहम्मद (स.) यांना विचारले, "हे अल्लाहचे पैगंबर ! माझी एक सवत आहे. (तिला चिडविण्यासाठी) माझा पती जे काही मला देतो त्यापेक्षा अधिक तिखट-मीठ लावून तिला सांगितले तर ते माझ्या हातून पाप ठरेल काय?"

यावर पैगंबर म्हणाले, "न दिलेली वस्तु सांगणारी व्यक्ती खोटेपणाची दोन वस्त्रे परिधान केलेल्या व्यक्तीसमान आहे." *(हदीस : बुखारी)*

# अफवा पसरविणे

लोक जेव्हा एखादी गोष्ट ऐकतात तेव्हा तिची सत्यासत्यता समजून घेण्याऐवजी ती लगेच इतरांना सांगतात. अशा प्रकारे समाजात अनेक खोट्या गोष्टी पसरविल्या जातात. मग ती गोष्ट ऐकणारे लोकदेखील तिच्या खरे-खोटेपणाचा विचार न करता पुन्हा अफवा पसरविणाऱ्या दुसऱ्या लोकांना सांगतात. अशा रीतीने एक गोष्ट दूरदूरपर्यंत पसरली जाते आणि अनेकानेक लोकांद्वारे सांगितली जाते. मात्र ती अतिशय चुकीची किंवा अगदीच क्षुल्लक गोष्ट पसरत पसरत अत्यंत मोठी बनते. कारण सामान्यपणे प्रत्येक मनुष्य एखादी गोष्ट दुसऱ्याला सांगताना स्वत:तर्फे थोडेफार तिखट-मीठ लावूनच बोलत असतो. त्यामुळे पहिल्या माणसाने सांगितलेली गोष्ट शेवटच्या माणसापर्यंत पोहोचता पोहोचता काहीच्या काहीच झालेली असते.

अशा प्रकारे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी आणि दुसऱ्या ठिकाणाहून तिसऱ्या ठिकाणी पोहोचता पोहोचता अनेकांच्या तोंडातून बाहेर पडलेल्या गोष्टीलाच अफवा म्हणतात. अरबी भाषेत तोंडाला 'फ़म्' म्हटले जाते आणि याचे बहुवचन 'अफवाह' अर्थात 'अनेक तोंडे' असे होते आणि हाच शब्द मराठीत 'अफवा' असा बनला आहे.

सत्यासत्यता समजून न घेता एखादी गोष्ट अनेक तोंडांद्वारे सांगितली जाते तिला अफवा म्हटले जाते. अफवा पसरविणेदेखील एकप्रकारे खोटारडेपणा आहे.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे, "माणूस खोटारडा असण्याकरिता इतके पुरेसे आहे की त्याने ऐकलेली गोष्ट (खरी आहे की खोटी याची शहानिशा केल्याशिवाय) इतरांना सांगत सुटावे." *(हदीस : मुस्लिम)*

इब्ने वहब यांच्या निवेदनानुसार,

मला इमाम मालिक यांनी सांगितले, "इतरांकडून ऐकलेली गोष्ट दुसऱ्यांना सांगणारा माणूस (चुकूनही) वाचू शकत नाही आणि ऐकीव गोष्ट सांगणारा माणूस कसलेही नेतृत्व करू शकत नाही."

मुहम्मद बिन अल-मसना (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

अब्दुर्रहमान बिन मेंहदी (रजि.) यांनी सांगितले, "जोपर्यंत मनुष्य ऐकीव गोष्टी इतरांना सांगण्यापासून स्वत:ला रोखत नाही तोपर्यंत तो आज्ञापालन करण्यायोग्य नेतृत्व करू शकत नाही." *(हदीस : मुस्लिम)*

# चुगली-चहाडी, निंदा, खोटा आळ घेणे

अबू हुरैरा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या सहकाऱ्यांना विचारले, "तुम्हाला माहीत आहे काय की चुगली वा निंदा कशास म्हणतात?"

सहकारी म्हणाले, "अल्लाह व त्याच्या पैगंबरांनाच उत्तमरित्या माहीत आहे!"

पैगंबर म्हणाले, "तुम्ही आपल्या बंधुचा उल्लेख त्याच्या अनुपस्थितीत अशा रितीने करावा जे त्यास पसंत नसावे."

लोकांनी विचारले, "आम्ही उल्लेख केलेली बाब खरोखरच आमच्या भावात असेल तर? (तरीदेखील निंदा ती ठरू शकते काय?)"

पैगंबर मुहम्मद (स.) उत्तरले, "ती बाब तुमच्या भावात आढळत असेल तर ती निंदा ठरेल आणि ती गोष्ट त्याच्यात आढळून येत नसेल तर तुम्ही त्याच्यावर खोटा आळ घेत आहात."

*(हदीस : मुस्लिम)*

या हदीसद्वारे निंदा व खोटा आळ घेण्याचा अर्थ पूर्णपणे स्पष्ट होतो.

तफहीमुल कुरआन, भाग ५, पृष्ठ ९३ वर तिन्ही शब्दांचा अर्थ अशा प्रकारे सांगण्यात आलेला आहे,

"एखाद्याच्या अनुपस्थितीत त्याच्यात असलेल्या दोषाचा उल्लेख करणे पूर्णत: निषिद्ध आहे. खरोखरच तो दोष त्याच्यात असेल तर ती निंदा ठरेल, खोटा असेल तर खोटा आळ ठरेल आणि दोन माणसांत भांडण लावण्यासाठी असेल तर ती चहाडी ठरेल."

कुरआनात अल्लाहने चहाडी निषिद्ध ठरविताना म्हटले आहे,

*"आणि तुमच्यापैकी कुणीही कुणाची चहाडी करू नये. काय तुमच्यापैकी एखादा असा आहे की जो आपल्या मृत भावाचे मांस खाणे पसंत करील? पाहा, तुम्हा स्वत:ला याची घृणा वाटेल अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा, अल्लाह मोठा पश्चात्ताप स्वीकारणारा आणि परम कृपाळू आहे."*

*(दिव्य कुरआन - ४९:१२)*

निंदेच्या बाबतीत उपरोल्लेखित वर्णनावरून हे स्पष्ट होते की कुणी खरोखरच एखाद्यात असलेला दोष इतरांसमोर चव्हाट्यावर आणावा, यालाच निंदा करणे असे म्हणतात. या अर्थावरून आपल्या लक्षात येते की जे लोक एकमेकांची निंदा करतात आणि मग आपण सत्य गोष्ट सांगत आहोत असे सांगून स्वत:ची समजूत काढत असतात, त्यांची ही समजूतच किती खोटी असते. खऱ्या वक्तव्याचेच नाव निंदा आहे आणि याच खऱ्या वक्तव्याला इतके तुच्छ ठरविण्यात आले आहे की हे खरे वक्तव्य करणे म्हणजे आपल्या मृत बंधुचे मांस खाणे होय.

माननीय अनस बिन मालिक (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "जेव्हा मी 'मेअराज'च्या प्रवासावर गेलो तेव्हा मी तांब्याची नखे असलेले लोक स्वत:च्या चेहऱ्यावर आणि छातीवर कुरतडून जखमा करीत असल्याचे पाहिले. मी विचारले, हे जिब्राईल! हे लोक कोण आहेत? जिब्रिल (अ.) म्हणाले, हे ते लोक आहेत जे लोकांचे मांस खात होते (अर्थात त्यांची निंदा करीत होते) आणि त्यांच्या अब्रूशी खेळत होते."

*(हदीस : अबू दाऊद)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "हे लोकहो! ज्यांनी केवळ मौखिक स्वरूपात तर श्रद्धा धारण केली, मात्र अद्यापही श्रद्धा तुमच्या अंत:करणात उतरली नाही, मुस्लिमांची निंदा करू नका आणि त्यांच्या गुप्त दोषांचा माग घेऊ नका. कारण जो त्यांच्या दोषांचा मागोवा घेईल, अल्लाह त्याचे गुप्त दोष शोधून काढील आणि त्यास त्याच्या घरातच अपमानित करील." *(हदीस : अबू दाऊद)*

माननीय हुजैफा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले, "निंदा करणारा माणूस स्वर्गात जाणार नाही." *(हदीस : बुखारी)*

माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) दोन कबरींजवळून जात असताना म्हणाले, "या दोघांना (ज्यांच्या कबरी आहेत त्यांना) यातना दिल्या जात आहेत आणि एखाद्या मोठ्या बाबीसाठी दिल्या जात नसाव्यात." पुन्हा ते म्हणाले, "होय, का नाही (एकप्रकारे ती बाब

मोठीसुद्धा आहे). यापैकी एकजण निंदक होता तर दुसरा अंतर्बाह्य दूषित राहात होता.''

*(हदीस : बुखारी)*

माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) यांच्या कथनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले, ''मी तुम्हांस सांगू काय की खोटा आळ घेणे हे किती घोर पाप आहे? हा तो खोटा आळ आहे ज्यामुळे समाजात वैरभाव पसरतो.''

*(हदीस : मुस्लिम)*

माननीय आएशा (रजि.) यांच्या निवेदनानुसार, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले, ''मी कुणाची चहाडी करावी ही गोष्ट मी पसंत करीत नाही; मग (भले त्याच्या मोबदल्यात) मला हे मिळो आणि हे मिळो (अर्थात बरेच काही प्राप्त होवो).''

*(हदीस : तिर्मिजी)*

माननीय आएशा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना म्हणाले, ''हे अल्लाहचे पैगंबर! सफिया (रजि.) तर अशीच महिला आहे.'' आणि मी इशाऱ्याने सांगितले की अशी म्हणजे बुटकी आहे.

यावर पैगंबरांनी सांगितले, ''तुम्ही तर अशी गोष्ट करीत आहात जणू ती समुद्राच्या पाण्यात मिसळली तर ते प्रदूषित होईल.'' *(हदीस : तिर्मिजी)*

माननीय अब्दुर्रहमान बिन गुनम आणि माननीय असमा बिन्त यजीद (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ''अल्लाहचे सर्वोत्तम दास ते असतात ज्यांना पाहिल्यानंतर अल्लाहची आठवण होते आणि अल्लाहचे सर्वांत वाईट दास ते आहेत जे चहाडी करीत फिरतात, मित्रांमधील वितुष्टीचे कारण बनतात आणि निष्पाप लोकांना संकटात पाडण्याच्या प्रयत्नात असतात.'' *(हदीस : मुसनद अहमद)*

माननीय इब्ने मसऊद (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ''माझ्या सहकारी (रजि.) यांच्यापैकी कोणीही एकमेकांची वार्ता माझ्यापर्यंत पोहचवू नका, कारण जेव्हा मी तुमच्याकडे येईन तेव्हा माझे मन (सर्वांच्या दृष्टिकोनातून मोकळे आणि) निरोगी असलेलेच मला आवडेल.''

*(हदीस : अबू दाऊद)*

जेव्हा मनुष्य एखाद्याची निंदा करतो तेव्हा त्या मनुष्याचे पुण्य तो ज्याची निंदा करतो त्यास मिळते आणि निंदा करण्याचे हेच मोठे नुकसान आहे.

ख्वाजा हसन बसरी यांना एकदा अशी बातमी कळली की अमुक माणसाने त्यांची निंदा केली आहे. त्यांनी खजुरांची एक थाळी त्याच्याकडे भेट म्हणून पाठविली आणि त्यासह हा संदेशही पाठविला, "मला अशी बातमी कळली आहे की तुम्ही आपले पुण्य माझ्या नावे परिवर्तीत केले आहे. या उपकाराची परतफेड करण्याची माझी ऐपत नाही, म्हणून केवळ ही खजूर सादर करण्यातच मी धन्यता मानतो."

तात्पर्य असे की निंदा करणे हे महापाप आहे आणि आपल्या कामना निरोगी ठेऊ इच्छिणाऱ्या माणसाने निंदा करण्यापासून स्वत:ला अवश्य अलिप्त ठेवले पाहिजे.

या ठिकाणी हे जाणून घेणे आवश्यक आहे की एखाद्याच्या अनुपस्थितीत म्हटली जाणारी प्रत्येक गोष्ट निंदा ठरत नसते. काही बाबी कुणाच्या तरी अनुपस्थितीतच कराव्या लागतात परंतु त्यांना निंदा म्हटले जाऊ शकत नाही आणि तो अपराधही ठरत नाही. कारण अशा विशिष्ट परिस्थितीत असे करणे आवश्यक असते. जसे माणसाला एखाद्या कुटुंबात विवाहसंबंध जुळवायचे असतील आणि त्याबाबतीत एखाद्याकडून सल्ला घ्यावयाचा असेल. ज्याच्याकडून सल्ला घेतला जात आहे त्याला विवाहसंबंधात काही विघ्न असल्याचे माहीत असेल तर ते त्याने सांगावयास हवे जेणेकरून त्या माणसाचे एखाद्या चुकीच्या ठिकाणी विवाहसंबंध प्रस्थापित होऊ नयेत. आता या बाबतीत जी गोष्ट सांगितली जाईल त्यास निंदा म्हटली जाणार नाही. कारण चुकीच्य ठिकाणी विवाहसंबंध प्रस्थापित करणाऱ्या माणसाची त्यामुळे फसवणूक होणार नाही. अशाच प्रकारे जर एखाद्याचे प्राण, संपत्ती, अब्रू अथवा धर्माला धोका निर्माण होणार असेल तर त्यास त्या धोक्यापासून वाचविण्यासाठी क्रूर अथवा फसवणूक करणाऱ्याच्या बाबतीत जे काही सांगितले जाईल मग ते त्याच्या पाठीमागे का असेना त्यास निंदा म्हटले जाणार नाही.

निंदेप्रमाणेच खोटा आळ घेण्याचादेखील निषेध करण्यात आला आहे.

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांच्या निवेदनानुसार, मी अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांना असे म्हणताना ऐकले आहे, "अल्लाहच्या मर्यादांपैकी एखाद्या मर्यादेचे उल्लंघन करण्याची शिफारस करणारा अल्लाहचा विरोधक ठरतो आणि जाणूनबुजून एखाद्या अनावश्यक बाबतीत भांडण करणारावर ते संपुष्टात येईतोपर्यंत

निरंतर अल्लाहचा राग असेल. तसेच श्रद्धावंतामध्ये नसणारी गोष्ट सांगणाराला, त्याबद्दल तो जोपर्यंत क्षमायाचना करीत नाही तोपर्यंत अल्लाह नरकातील रक्त व पूवाच्या चिखलात ठेवील.''

*(हदीस : अबू दाऊद)*

कुरआनमध्ये खोटा आळ घेण्याची अतिशय कठोर शिक्षा सांगताना म्हटले आहे,

*''जे लोक शीलवान, अजाण श्रद्धावंत स्त्रियांवर आळ घेतात त्यांचा इहलोक व परलोकात धिक्कार केला गेला आणि त्यांच्यासाठी मोठा प्रकोप आहे. त्यांनी त्या दिवसाला विसरू नये की जेव्हा त्यांच्या स्वत:च्या जिव्हा, त्यांचे हात, पाय त्यांच्या कृत्यांची साक्ष देतील. त्या दिवशी अल्लाह तो बदला त्यांना पुरेपूर देईल ज्याला ते पात्र आहेत आणि त्यांना माहीत होईल की अल्लाहच सत्य आहे, खऱ्याला खरे करून दाखविणारा.''*

*(दिव्य कुरआन, २४:२३-२५)*

# अर्वाच्चपणा

अबू हुरैरा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले, "जेव्हा दोन माणसे आपसांत शिव्या-शाप देऊ लागतात तेव्हा शिव्या देण्यास सुरुवात करणाऱ्यालाच याचे पाप लागते, जोपर्यंत अन्यायपीडित अतिरेक करीत नाही." *(हदीस : बुखारी)*

माननीय आएशा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे एक माणूस हजर होण्याची परवानगी मागू लागला. पैगंबरांनी म्हटले, "त्याला आत येण्याची परवानगी द्या, मात्र तो त्याच्या कबिल्यातील एक वाईट माणूस आहे."

परंतु तो माणूस आत आला तेव्हा पैगंबर त्याच्याशी खूप नरमाईने बोलले.

माननीय आएशा (रजि.) म्हणतात की मी पैगंबरांना विचारले, "हे अल्लाहच्या पैगंबर! आपण त्याच्याबाबत काही वेगळेच सांगितले होते, मात्र तुम्ही तर त्याच्याशी नरमाईने बोलला!"

पैगंबर म्हणाले, "हे पाहा आएशा (रजि.)! ज्याच्या अर्वाच्च वक्तव्यापासून स्वत:ला वाचविण्यासाठी लोक त्याला सोडून देतील तो अंतिम निवाड्याच्या दिवशी अल्लाहच्या दृष्टीत सर्वांत वाईट माणूस असेल." *(हदीस : मुस्लिम)*

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "खालील चार गोष्टी ज्याच्यात आढळतील तो महाकपटी माणूस आणि ज्याच्यात या चारांपैकी एखादी गोष्ट असेल तर त्याच्यात कपटीपणाची एक सवय आहे इथपावेतो त्याने ती सोडून द्यावी. (त्या चार गोष्टी पुढीलप्रमाणे आहेत.

(१) ठेव ठेवण्यात आल्यास अप्रामाणिकपणा करणे.

(२) संभाषण करताना खोटे बोलणे.

(३) दिलेले वचन न पाळणे.

(४) आणि भांडणात अर्वाच्च भाषेचा वापर करणे.

माननीय अब्दुल्लाह बिन अम्र बिन आस (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले, "आईवडिलांना शिवीगाळ करणे हे अत्यंत मोठे पाप आहे."

लोकांनी विचारले, "हे अल्लाहच्य पैगंबर! आपल्या आईवडिलांना कुणी शिवागाळ कसा करील?"

पैगंबर म्हणाले, "होय. एक माणूस जेव्हा दुसऱ्याच्या आईवडिलांना शिवीगाळ करतो, तेव्हा तो मुळात स्वत:च्याच आईवडिलांना शिवीगाळ करतो आणि एखादा माणूस जेव्हा दुसऱ्याच्या आईला शिवीगाळ करतो तेव्हा तो स्वत:च्याच आईला शिवीगाळ करतो. (म्हणजेच त्याने आपल्या आईवडिलांना स्वत:च शिवीगाळ केली. त्याने कुणाच्या आईवडिलांना शिवी दिली नसती तर इतरांनीही त्याच्या आईवडिलांना शिवी दिली नसती.)" *(हदीस : मुस्लिम)*

पैगंबर मुहम्मद (स.) बोलण्याच्या बाबतीत इतके सावध होते की वाईट लोकांच्या दुष्टतेच्या उत्तरादाखलदेखील कडक वक्तव्य करीत नसत.

माननीय आएशा (रजि.) यांच्या निवेदनानुसार, काही ज्यू लोक पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे आले आणि ('अस्सलामु अलैकुम' म्हणण्याऐवजी दुष्टपणाने) 'अस्साम् अलयकुम' म्हटले (अर्थात तुमच्यावर मृत्यु ओढावला जावो). यावर मी म्हटले, "तुमच्यावरच मृत्यु ओढावला जावो आणि तुमच्यावर अल्लाहचा धिक्कार असो आणि तुमच्यावर अल्लाहचा प्रकोप कोसळो."

यावर पैगंबर म्हणाले, "थांबा, हे आएशा (रजि.)! नरमाईने बोला आणि कडक व अर्वाच्च वक्तव्य टाळा." *(हदीस : बुखारी)*

संकटसमयी अथवा एखाद्या अडचणीत सापडल्यास काळाला शिवीगाळ करण्यास सुरुवात करण्याची काही लोकांना सवय असते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या वाईट कृत्यापासून अलिप्त राहण्यास सांगितले आहे.

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांच्या निवेदानानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "काळच वाईट आहे असे तुमच्यापैकी कुणी म्हणू नये, कारण अल्लाह स्वत:च काळ आहे." *(हदीस : मुअत्ता)*

"अल्लाह स्वत:च काळ आहे." असे पैगंबरांनी म्हटले, अर्थात जगात जे काही घडते ते अल्लाहच्या आदेशानेच घडते, काळाच्या आदेशाने घडत नाही. म्हणून जर तुम्ही काळाला वाईट म्हणाल तर ते अल्लाहच्या वर्चस्वाचा अपमान करण्यासारखे होईल.

असेच काही लोक जेव्हा एखाद्या संकटात अडकतात तेव्हा सामान्य लोकांना वाईट बोलू लागतात. असे केवळ आपल्या मनात दाबून ठेवलेल्या गोष्टी व्यक्त करण्यासाठी होत असते, अन्यथा अर्वाच्च बोलणाऱ्यालादेखील माहीत असते की त्याच्या या अडचणीच्या समयी सर्वसामान्य लोक पूर्णत: निर्दोष आहेत. त्यांच्या या संकटाचे कारण एखादा मनुष्यच असेल तर मग तो एखादा माणूस अथवा काही माणसे असतील, सर्व लोक नसतील, परंतु ते आपले दु:ख व राग व्यक्त करण्यासाठी सर्व लोकांवर तुटून पडतात. ही एक वाईट कृती आहे आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी यास तुच्छ म्हटले आहे.

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तुम्ही एखाद्या माणसाला 'सर्व लोक उद्ध्वस्त होतील' असे म्हणताना ऐकले तर तो स्वत: सर्वाधिक उद्ध्वस्त होणारा माणूस असेल." *(हदीस : मुअत्ता)*

# धिक्कार करणे

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले आहे,

"जेव्हा एखादा माणूस कुणाला धिक्कारतो तेव्हा त्याचे हे धिक्कारणे थेट आकाशाकडे पोहोचते. मात्र आकाशाची दारे त्याच्याकरिता बंद करण्यात येतात आणि त्याचा धिक्कार परतून जमिनीकडे येतो तेव्हा जमिनीची दारेदेखील त्याच्याकरिता बंद केली जातात. मग उजव्या-डाव्या बाजूला फिरतो आणि जेव्हा त्यास कोणताच मार्ग सापडत नाही तेव्हा तो धिक्कारलेल्यावर येतो. जर तो धिक्कारायोग्य असेल (तर ठीक) अन्यथा मग (तो धिक्कार) धिक्कारणाऱ्याकडेच परततो." *(हदीस : अबू दाऊद)*

या हदीसवचनावरून असा उपदेश मिळतो की धिक्कारण्यापासून अलिप्त राहावे, कारण धिक्कारलेला माणूस त्या धिक्कारास योग्य नसेल तर धिक्कारणारा स्वत: आपल्याच धिक्काराला बळी पडेल.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हेदेखील म्हटले आहे,

"कुणासही ईश्वराच्या धिक्काराने फटकारू नका आणि ईशप्रकोप व नरकाग्नीच्या शिक्षनेही फटकारू नका." *(हदीस : अबू दाऊद)*

याचा अर्थ असा की "तुझ्यावर अल्लाहचा धिक्कार असो" किंवा "तुझ्यावर अल्लाहचा प्रकोप असो" अथवा "तुझ्यावर नरकाग्निचा कोप होवो" असे कुणासही म्हणू नका.

सही मुस्लिम या हदीसग्रंथात आहे की बनू उमैयाचे पाचवे खलीफा अब्दुल मलिक बिन मरवान यांनी एका रात्री आपल्या सेवकाला हाक मारली. त्याला येण्यास विलंब झाला. अब्दुल मलिक यांनी त्याला धिक्कारले. सकाळ झाल्यानंतर त्यांनी अब्दुल मलिक यांना विचारले,

"रात्री मी ऐकले की तुम्ही आपल्या सेवकाला हाक मारताना त्याला धिक्कारले."

मी अबू दरदा (रजि.) यांना असे म्हणताना ऐकले की,

अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"धिक्कारणारे अनेकजण अंतिम निवाड्याच्या दिवशी न कोणाचे साक्षीदार

असतील न कोणाच्या मुक्तीची शिफारस करणारे असतील.''

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''सत्यवचनी व्यक्तीने कोणाचा धिक्कार करणे योग्य नाही.''

या हदीसवचनाच्या स्पष्टीकरणात सांगण्यात आले आहे की, एकदा माननीय अबू बकर सिद्दीक (रजि.) यांनी आपल्या गुलामास धिक्कारले होते. यावर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, ''धिक्कारणारा असणे हे सिद्दीकीकरिता योग्य नाही.''

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मद्यपिलादेखील धिक्कारण्यास मनाई केली आहे.

*(हदीस : बुखारी)*

धिक्कारण्याची सवय असणारे लोक फक्त मानवतेलाच धिक्कारतात असे नाही तर प्राणी व निर्जीव वस्तूंनादेखील ते धिक्कारतात. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या वाईट सवयीपासून दूर राहण्यास सांगितले आहे.

माननीय इमरान बिन हुसैन यांच्या निवेदनानुसार,

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) एका प्रवासात होते. त्यांनी (कुणाच्या तरी) धिक्कारण्याचा आवाज ऐकला.

पैगंबरांनी विचारले,

''ही कोण आहे?''

लोकांनी सांगितले,

''ती अमुक महिला आहे. ती आपल्या स्वारीचा धिक्कार करीत आहे.''

यावर पैगंबर म्हणाले,

''या स्वारीवरून पालान (प्रवासात घोड्याच्या किंवा उंटाच्या पाठीवर घालण्याचे कापड) काढून टाका, कारण ते धिक्कारलेले आहे.''

मग लोकांनी त्या स्वारीवरील पालान काढून घेतले.

माननीय इमरान म्हणतात,

“मी पाहिले की ती एक काळी सांडणी होती.” *(हदीस : अबू दाऊद)*

या हदीसवचनाच्या स्पष्टीकरणात सांगण्यात आले आहे की तुम्ही जर त्या सांडणीचा धिक्कार करता तर त्यावर स्वार होण्याचा तुम्हाला अधिकार नाही, हे धिक्कारणाऱ्या महिलेच्या निदर्शनास आणण्याचा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी पालान काढून घेण्यामागचा उद्देश होता.

माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

एका माणसाने पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यादेखत हवेचा धिक्कार केला. यावर पैगंबरांनी सांगितले,

“हवेचा धिक्कार करू नका, कारण तिच्यावर (अल्लाहच्या आदेशानुसार चालण्याचे) बंधन आहे. धिक्कारण्यायोग्य नसलेल्याचा धिक्कार करणाऱ्या माणसावर तो धिक्कार परतत असतो.” *(हदीस : तिर्मिजी)*

# टोमणे मारणे

'तअन' अरबी भाषेतील शब्द आहे आणि याचा अर्थ आहे 'भाला मारणे'. ज्याप्रमाणे टोमणे मारल्याने ह्रदय अतिशय दुखावले जाते जणू कुणी ह्रदयावर भाला मारावा, म्हणून या वाईटपणास टोमणे मारणे असे म्हटले जाते. टोमणे मारण्याचे अनेक प्रकार असतात आणि ते सर्वच्या सर्व निषिद्ध ठरविण्यात आले आहेत.

काही लोक दुसऱ्यांच्या वंश-परिवारावर टोमणे मारतात, काहीजण एखाद्यावर उपकार करून नंतर त्याला त्याची वारंवार आठवण करून देऊन टोमणे मारत राहतात तर काही दुसऱ्यांच्या रंगरूपावर टोमणे मारतात. टोमणे मारण्यामागचे कोणतेही कारण असो, ज्याला ते मारले जाते त्याला निश्चितच त्रासदायक ठरत असते. टोमणे मारणे हेदेखील दुसऱ्याला तुच्छ लेखणे असून ती एकप्रकारची निंदानालस्तीसुद्धा आहे. मात्र दोन्हींमध्ये फरक एवढाच की निंदा पाठीमागे केली जाते तर टोमणे समोर मारले जातात.

कुरआनमध्ये म्हटले आहे,

*"आणि आपसांत एकमेकांवर टोमणे मारू नका आणि एकमेकांचा वाईट नामोल्लेख करू नका." (दिव्य कुरआन, ४९:११)*

एखाद्यावर उपकार करून जे लोक पुण्यकर्म करतात आणि मग त्यांना टोमणे मारतात ते आपले पुण्य स्वत: नष्ट करतात, कारण उपकाराची आठवण करून दिल्यास किंवा त्यानंतर ज्यावर उपकार केले जातात त्याला त्रास दिला गेल्यास त्या उपकाराचे पुण्य संपुष्टात येते. त्याचप्रमाणे एखाद्याच्या रंगरूपामुळे त्याला टोमणे मारणारे वास्तविकपणे अल्लाहचीच अवज्ञा करीत असतात, कारण कोणत्याही मानवाने आपले रंगरूप स्वत: बनविलेले नसते. तसेच एखाद्याच्या वंशाबाबत टोमणे मारणारे महामूर्खपणाचे कर्म करीत असतात, कारण एखाद्याचा वंश किंवा कुळ उच्च अथवा कनिष्ठ मानवाने स्वत: निवडलेला नसतो.

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

मी माननीय अब्दुल्लाह बिन अब्बास (रजि.) यांना असे सांगताना ऐकले आहे, "एखाद्याच्या कुळ वा वंशावर टोमणे मारणे किंवा (मृत्युनंतर) अतिशय शोक

व्यक्त करणे मूर्खपणाच्या सवयी आहेत.''

आणि (त्यांनी एक) तिसरी गोष्ट (देखील सांगितली होती मात्र तिचा) अब्दुल्लाह (रजि.) यांना विसर पडला. *(हदीस : बुखारी)*

माननीय अबू जर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

मी एका माणसास (माझ्या गुलामास) शिवी दिली आणि त्याला त्याच्या आईकडून मार देवविला तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मला सांगितले,

''हे पाहा अबू जर! तुम्ही त्याच्या आईकडून त्याला मार देवविला? निश्चितच तुम्ही मूर्खपणा (अडाणीपणा) अजून पूर्णतया सोडलेला नाही.'' *(हदीस : बुखारी)*

# विलाप (मृत्युशोक) करणे

मृत्युनंतर विलाप (रडणे, शोक व्यक्त करणे) हा जिव्हेचा एक मोठा नापसंत वापर आहे. एखाद्या नातेवाईकाचे या जगातून निघून जाणे निश्चितच अतिदु:ख व हृदयद्रावक घटना आहे, म्हणून मन दु:खी होणे आणि अश्रू ढाळणे एक नैसर्गिक गोष्ट आहे आणि यावर कसलेही बंधन नाही.

स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनीदेखील आपल्या स्नेहींच्या मृत्युवर अश्रू ढाळले आहेत, मात्र अल्लाहच्या दृष्टिकोनातून नापसंत असलेले वक्तव्य आपल्या मुखाद्वारे करण्याच्या बाबतीत आदेश आहे.

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

माननीय सअद बिन उबादह (रजि.) जेव्हा आजारी होते आणि त्यांची अंतिम घटिका जवळ आली होती तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.), माननीय अब्दुर्रहमान बिन औफ (रजि.), माननीय सअद बिन अबी वक्कास (रजि.) आणि माननीय अब्दुल्लाह बिन मसऊद (रजि.) यांच्याबरोबर त्यांची विचारपूस करण्यासाठी आले असता ते आपल्या घरी बिछान्यावर झोपलेले होते. पैगंबर म्हणाले, "यांचा मृत्यु झाला काय?"

लोकांनी उत्तर दिले, " नाही. हे अल्लाहच्या प्रेषिता!"

मग पैगंबरांना आपले अश्रू आवरता आले नाहीत आणि ते रडू लागले. पैगंबरांना रडताना पाहून इतर लोकही रडू लागले.

पैगंबर म्हणाले, "डोळ्यांतून अश्रू ढाळल्यास आणि मन दु:खी झाल्यास अल्लाह शिक्षा देत नाही, तर अल्लाह यामुळे (त्यांनी आपल्या जिभेकडे इशारा केला) शिक्षा देतो." *(हदीस : बुखारी)*

अज्ञानकाळात विलाप करण्याची प्रथा होती. काही भागांवरून असे लक्षात येते की कदाचित त्यांच्यात विलापाचा बदला देण्याची प्रथादेखील होती. जसे एका महिलेने दुसऱ्या महिलेच्या एखाद्या नातेवाईकाच्या मृत्युनंतर विलाप केला तर पहिल्या महिलेच्या नातेवाईकाच्या मृत्युनंतर दुसऱ्या महिलेनेदेखील तिथे जाऊन विलाप करावा अशी अपेक्षा केली जात होती.

माननीय उम्मे अतिया (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

आम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडून दीक्षा घेतली. त्यांनी आमच्यासमोर 'अल्ला युश्रिक् बिल्लाहि शैआ' या आयतीचे पठण केले आणि आम्हाला विलाप करण्यास मनाई केली, तेव्हा एका महिलेना आपला हात मागे घेतला आणि म्हणाली, "अमुक महिलेने (माझ्या एका नातेवाईकाच्या मृत्युनंतर विलाप करताना) मदत केली होती. त्याचा बदला द्यावा अशी माझी इच्छा आहे."

यावर पैगंबर मुहम्मद (स.) तिला काहीही बोलले नाहीत. ती महिला घरी गेली आणि परत आली तेव्हा पैगंबरांनी तिला दीक्षा दिली. *(हदीस : बुखारी)*

इस्लामच्या पुनरुत्थानानंतर अज्ञानावस्थेतील आणखीन अनेक प्रथा-परंपरा बंद करण्यात आल्या, त्याचबरोबर विलाप करण्यासदेखील मनाई करण्यात आली.

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांच्या निवेदानानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "तोंडावर मारून घेणारा, कपडे फाडणारा आणि मूर्खपणाने ओरडणारा आमच्यापैकी नाही." *(हदीस : बुखारी)*

माननीय आएशा (रजि.) यांच्या निवेदानानुसार,

माननीय जैद बिन हारिशा (रजि.), माननीय जाफर (रजि.) आणि माननीय अब्दुल्लाह बिन रवाहा (रजि.) यांच्या हौतात्म्याची बातमी कळताच पैगंबर मुहम्मद (स.) खाली बसले आणि त्यांच्या चेहऱ्यावर दु:खाचे सावट स्पष्ट दिसत होते आणि मी दरवाजाच्या फटीतून पाहात होते. पैगंबरांजवळ एक माणूस आला आणि म्हणाला, "हे अल्लाहचे पैगंबर! जाफर (रजि.) यांच्या पत्नीं रडत व विलाप करीत आहेत."

तेव्हा पैगंबरांनी त्यांना आदेश दिला, "जाऊन त्यांना तसे करण्यापासून मनाई करा."

तो माणूस निघून गेला (मात्र काही वेळानंतर) परत आला आणि म्हणाला, "अल्लाहशपथ! (त्या माझे ऐकत नाहीत) मी लाचार आहे."

माननीय आएशा (रजि.) म्हणतात की त्यानंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "जा! त्यांच्या तोंडात माती भरा...!" *(हदीस : बुखारी)*

# खोटी स्तुती

अबू मूसा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ऐकले की एक माणूस कुणाची तरी प्रशंसा करीत आहे आणि खोटी स्तुती करीत आहे. यावर त्यांनी म्हटले,

"तुम्ही (त्या माणसाची खोटी स्तुती करून) त्यास नष्ट केले. अथवा (असे सांगितले की) तुम्ही त्या माणसाचे कंबरडे मोडले." *(हदीस : बुखारी)*

याचा अर्थ असा की एखाद्याच्या खोट्या स्तुतीमुळे तो माणूस घमेंडखोर होईल आणि घमेंडीमुळे त्या माणसाचे जीवन उद्ध्वस्त होईल.

माननीय अबू बकर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासमोर एका माणसाने (दुसऱ्या) एका माणसाची प्रशंसा केली. यावर पैगंबर म्हणाले,

"तुझे जीवन उद्ध्वस्त होवो, तू आपल्या भावाचा गळा चिरला."

असे पैगंबरांनी तीनदा म्हटले. (पैगंबर पुढे म्हणाले,)

"जर तुमच्यापैकी एखाद्याला (दुसऱ्याची) प्रशंसा करावयाची असेल, जर तो त्याला ओळखत असेल तर असे म्हणा मी (याला) असे आणि असे समजतो आणि अल्लाह याचे संरक्षण करणारा आहे आणि मी अल्लाहव्यतिरिक्त कुणाला पवित्र समजत नाही." *(हदीस : बुखारी)*

माननीय मुआविया (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी म्हटले,

"परस्परांची खोटी स्तुती करू नका, कारण हे एकमेकांचा गळा चिरण्यासम आहे." *(हदीस : इब्ने माजा)*

खोटी प्रशंसा करण्यासच पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मनाई केली आहे. त्या स्तुतीमध्ये खोटारडेपणाचा अंश असतो, चापलुसीचा पैलू असतो आणि ऐकणाऱ्याच्या मनात वरचढपणा व घमेंड निर्माण होते आणि त्यामुळे त्याचे जीवन उद्ध्वस्त होते.

कोणाला प्रोत्साहन देण्याकरिता त्याची स्तुती करणे अथवा एका मर्यादेत राहून योग्य प्रकारे प्रशंसा करणे वाईट गोष्ट नाही. स्वत: पैगंबरांनीदेखील प्रशंसेस योग्य अशा लोकांची अनेकदा स्तुती केली आहे. होय, मानवामध्ये घमेंड निर्माण करणारी स्तुती निश्चितच नापसंत आहे.

स्वत: आमच्या इतिहासात असे शासक, श्रीमंत व धनवान होऊन गेले आहेत आणि आजदेखील असतील ज्यांना आपली स्तुती करवून घेण्याची मोठी हौस होती आणि त्यांचे चापलूस मग त्यांची खरी-खोटी स्तुती करून त्यांना खूश करत आणि इनाम प्राप्त करत होते. शायरीच्या कलेतील एक प्रकार 'कसीदा' आहे, यात शायर आपल्या पात्राची अशा तऱ्हेने खोटी व प्रमाणापेक्षा अधिक स्तुती करतो आणि त्यात अशा प्रकारची गुणवैशिष्ट्ये सिद्ध करतो जी मानवाच्या (दुर्बल जीव) आवाक्याबाहेरची असतात. निश्चितच अशी खोटी स्तुती इस्लाममध्ये नापसंत आहे.

माननीय मअमर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

एक माणूस उभे राहून एका श्रीमंताची प्रशंसा करीत उभा होता, यावर माननीय मिकदाद (रजि.) त्याच्या चेहऱ्यावर माती टाकू लागले आणि म्हणाले, "आम्हास अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आदेश दिला आहे की खोटी स्तुती करणाऱ्याच्या चेहऱ्यावर माती टाकावी." *(हदीस : मुस्लिम)*

# जिव्हेचे काही इतर पाप

अशाच काही नापसंत गोष्टी आहेत ज्यांच्याकरिता जिव्हेचा शस्त्रासारखा वापर होतो. जसे एखाद्याचा उपहास करणे, गर्व व घमेंडीच्या गोष्टी करणे, एखाद्याला काफिर ठरविणे इत्यादी. या सर्व गोष्टींच्या बाबतीत अल्लाह आणि अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी नापसंती व्यक्त केली आहे आणि त्या गोष्टींपासून दूर राहण्याचे शक्य ते प्रयत्न करणे एका श्रद्धावंतास आवश्यक आहे.

कुरआनमध्ये अल्लाहने श्रद्धावंतांना संबोधित करून जिव्हेच्या रक्षणाच्या बाबतीत काही मार्गदर्शक तत्त्वे सांगितली आहेत.

*“हे लोकहो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे, पुरुषांनी दुसऱ्या पुरुषांची टिंगल उडवू नये, शक्य आहे की ते त्यांच्यापेक्षा उत्तम असतील, तसेच स्त्रियांनीसुद्धा दुसऱ्या स्त्रियांची टिंगल उडवू नये, शक्य आहे की त्या त्यांच्यापेक्षा उत्तम असतील. आपापसांत एकमेकांना टोमणे (व्यंग) मारू नका आणि एकमेकांचा उल्लेख वाईट नावानेही करू नका. श्रद्धा ठेवल्यानंतर दुराचारांत नाव मिळविणे फार वाईट गोष्ट आहे. जे लोक या वर्तनापासून परावृत्त होत नसतील ते अत्याचारी होत.” (दिव्य कुरआन-४९:११)*

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, “ज्याने आपल्या बंधुला काफिर (इस्लामविरोधक) म्हटले तेव्हा दोघांपैकी एकजण अवश्य काफिर झाला.”

*(हदीस : मुअत्ता)*

अर्थात, ज्याला काफिर म्हटले गेले आहे आणि वास्तविकतेत तो काफिर नसेल तर मग तसे म्हणणारा काफिर होईल कारण त्याने विनाकारण एका मुस्लिमास काफिर ठरविले.

कुरआनमधील सूरह लुकमान आयत क्र. १८ मध्ये गर्व आणि घमेंडीची निंदा करताना अल्लाहने म्हटले आहे, “आणि लोकांशी तोंड फिरवून बोलू नकोस, पृथ्वीवर ऐटीत चालूदेखील नकोस, अल्लाह कोणत्याही अहंकारी व गर्व करणाऱ्या व्यक्तीला पसंत करीत नाही.”

# स्तब्धतेचे लाभ

वाचा काबूत न राहिल्यामुळे माणूस अनेक प्रकारच्या पापकर्मांच्या अडचणींत सापडतो, म्हणून विचारवंतांनी एकीकडे जिव्हेचे रक्षण करण्याचा आदेश दिला आहे तर दुसरीकडे स्तब्ध राहण्याचे महत्त्वदेखील सांगितले आहे. स्पष्ट आहे की मानव जितके कमी बोलेल तितकीच चुकीचे बोलण्याची शक्यता कमी असते.

नि:शब्द राहणे म्हणजे मानवाने आवश्यकतेच्या वेळीही बोलू नये असे नव्हे. कारण ज्याप्रमाणे अनेक पापकर्मे जिव्हेने केली जातात तसेच अनेक पुण्यकर्मेदेखील जिव्हेद्वारेच पूर्णत्वास येतात. जसे एखाद्याला योग्य मार्ग दाखविणे, एखाद्या दु:खी माणसाचे सांत्वन करणे, कुरआनचे शिक्षण देणे इत्यादी. स्तब्ध राहण्यामागील गुणवैशिष्ट्ये व्यक्त करताना असे सांगावे की आवश्यकता नसताना बोलण्यासाठी तोंड न उघडल्यास अनेक अडचणींपासून आपला बचाव होतो.

माननीय अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांच्या निवेदानानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

“स्तब्ध राहणाराला मुक्ती मिळते.” *(हदीस : तिर्मिजी)*

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

“जो माणूस अल्लाह आणि पारलौकिक जीवनावर श्रद्धा बाळगतो, त्याने आपल्या शेजाऱ्याला त्रास देऊ नये आणि जो माणूस अल्लाह आणि पारलौकिक जीवनावर श्रद्धा बाळगतो, त्याने आपल्या पाहुण्यांचे स्वागत करावे आणि जो माणूस अल्लाह आणि पारलौकिक जीवनावर श्रद्धा बाळगतो, त्याने चांगले बोलावे अथवा नि:शब्द राहावे.” *(हदीस : मुस्लिम)*

माननीय इमरान बिन हत्तान यांच्या निवेदनानुसार,

मी एकदा अबू जर (रजि.) यांच्याकडे गेलो तेव्हा ते मस्जिदमध्ये काळे घोंगडे लपेटून एकटेच बसले होते. मी त्यांना विचारले,

“अबू जर (रजि.)! हे असे एकटेच आणि एकांतात का बसून आहात?”

यावर त्यांनी उत्तर दिले, मी पैगंबर मुहम्मद (स.) यांना असे म्हणताना ऐकले आहे,

"वाईट सोबत्यापेक्षा एकटेपण उत्तम आणि सदाचारी सोबती एकटेपणापेक्षा उत्तम चांगली गोष्ट बोलणे स्तब्ध राहण्यापेक्षा उत्तम आणि वाईट गोष्ट बोलण्यापेक्षा स्तब्ध राहिलेले बरे!" *(हदीस : बैहकी)*

इमाम गज़ाली यांनी न बोलता राहण्याची प्रशंसा करताना म्हटले आहे,

(१) स्तब्धता - विनाकष्टाची उपासना.

(२) दहशत - विनासाम्राज्याची.

(३) किल्ला - विनाभिंतीचा.

(४) विजय - विनाशस्त्र.

(५) विश्रांती - किरामन कातिबीनची.

(६) सवय - मजुरांची.

(७) वर्चस्व - शासकांचे.

(८) सार - कौशल्यांचे.

(९) उत्तर - अडाण्यांचे.

याव्यतिरिक्त खूप बोलणे म्हणजे एक नापसंत काम समजले जाते.

माननीय इब्ने उमर (रजि.) यांच्या निवेदनानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाहच्या नामस्मरणाव्यतिरिक्त दुसरी कोणतीही गोष्ट अधिक बोलू नका कारण अल्लाहच्या नामस्मरणाव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचे अधिक्य मनाला कठोर बनविते आणि कठोर मन असणारा माणूस अल्लाहपासून सर्वांत दूर असतो."
*(हदीस : तिर्मिजी)*

अशरफ अली थानवी यांनी म्हटले आहे,

"जो माणूस निरर्थक बडबडतो, इतरांचा धिक्कार व टिंगल-टवाळी करीत

फिरतो, त्याला खोटी भरभराट प्राप्त होणार नाही, कारण ज्याला परिणामांची जाणीव नसते आणि जो निष्काळजी असतो तोच दुसऱ्यांची निंदा करणे अथवा निरर्थक बडबडण्याचे काम करतो.''

अर्थात, जिव्हेच्या रक्षणास मनाच्या शुद्धतेच्या बाबतीत अधिक महत्त्व प्राप्त आहे. मनाची शुद्धता राखणाऱ्याने लक्षात ठेवले पाहिजे की आपल्या जिव्हेवर इतके दृढ नियंत्रण हवे की बोलण्याच्या प्रसंगी बोलायला हवे, मात्र जेव्हा न बोलताही काम होत असेल तर स्तब्धच राहावे, यातच मुक्ती आहे.

माननीय अब्दुल्लाह (रजि.) यांच्या निवेदानानुसार,

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, श्रद्धावंत

(१) जास्त टिंगल करणारा नसतो,

(२) जास्त धिक्कार करणारा नसतो,

(३) अश्लील गोष्टी करणारा नसतो आणि

(४) निरर्थक बडबड करणारा नसतो.

*(हदीस : तिर्मिजी)*

# जिव्हे निरंकुश का होते?

या सर्व चर्चेनंतर शेवटची व महत्त्वाची गोष्ट म्हणजे जिव्हेवर नियंत्रण कसे ठेवले जावे. ज्या लोकांना माहीत नसते की जिव्हेचे कुकर्म कशाप्रकारे मानवी चरित्रास कलंकित करतात आणि पारलौकिक जीवनातील शिक्षेस पात्र ठरवितात त्यांची जिव्हा निरंकुश असेल तर काही हरकत नाही. मात्र ज्या लोकांना कुरआन व हदीसचे ज्ञान आहे आणि निरंकुश जिव्हेचे नुकसानही माहीत आहे तेदेखील कधीकधी जिव्हेवर नियंत्रण ठेवू शकत नाहीत आणि अशी वक्तव्ये करतात जी जाहीररित्या पापकर्मांच्या सूचीत मोडतात, याचेच आश्चर्य वाटते.

इतकेच नव्हे तर असेही लोक आहेत ज्यांना जिव्हेच्या पापकर्मांची शिक्षा माहीत असते त्याचबरोबर त्यांना मनापासून इच्छा असते की आपली जिव्हा नियंत्रित ठेवावी आणि मग ते हे ध्येय प्राप्त करण्यासाठी प्रत्यक्ष प्रयत्नही करतात, मात्र तरीही कधीकधी असे घडते की जिव्हेला नियंत्रित ठेवण्याऐवजी तेच जिव्हेच्या नियंत्रणात जातात आणि इच्छा नसतानाही अशी वक्तव्ये करू लागतात जी पूर्णत: निंदानालस्ती असते.

कदाचित असे म्हटले जाईल की मग कसे शक्य आहे की एका मनुष्यास जिव्हेचे नुकसानही माहीत आहे आणि जिव्हेवरील नियंत्रणाची इच्छादेखील बाळगत असावा. तरीदेखील त्याची जिव्हा चलाखीने तो बोलू इच्छित नसलेली गोष्टदेखील बोलू लागते. मात्र शेवटी ती त्याची स्वत:ची जिव्हा आहे, त्याच्या नियंत्रणात न येणारी दुसऱ्या कुणाची जिव्हा थोडीच आहे?

ही अडचण अगदी योग्य वाटते, परंतु वास्तविकपणे मानव निरंकुश जिव्हेचे नुकसानही जाणतो आणि जिव्हावर नियंत्रण ठेवण्यासाठी इच्छुकही असतो, असे घडू शकते. तरीदेखील त्याची जीव्ह चलाखीने तो बोलू इच्छित नसलेली गोष्टदेखील बोलू लागते. अशा वेळी पुन्हा असे वाटू लागते की ती जिव्ह आमची स्वत:ची नसून कुणा दुसऱ्याची आहे आणि आमच्या इच्छेबाहेर गेलेली आहे. जिव्हेवरील नियंत्रणाच्या प्रयत्नात असलेले लोक याची ग्वाही देतात की जीभ वास्तविकपणे कधीकधी इतकी नियंत्रणाबाहेर जाते की तिच्यावर आमचा कसलाही अंकुश राहात नाही.

असे का घडते? आम्हाला जिव्हेवर नियंत्रण करण्याची खूप इच्छा असते, परंतु

तरीही तिला नियंत्रणात ठेवू शकत नाही?

याचे मुख्य कारण म्हणजे आमच्या इतर अनेक पापकर्मांना कारणीभूत असलेली चूक होय. धार्मिक आदेशांचे ज्ञान प्राप्त करताना आम्ही हे विसरतो की जोपर्यंत मनाचे योग्य प्रशिक्षण होत नाही तोपर्यंत फक्त ज्ञान प्राप्त करणेच पुरेसे नसते.

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

'जिव्हेच्या रक्षणाची हमी देणाऱ्याकरिता माझ्याकडे स्वर्गाची ठेव आहे.''

''सत्य सद्वर्तनाकडे नेत असते आणि सद्वर्तन स्वर्गाकडे नेत असते.''

''चहाडी करणारा स्वर्गात प्रवेश करू शकणार नाही.''

आता वाचण्यापुरते आम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांचे वरील मार्गदर्शन पठण केले, परंतु याचा संपूर्ण परिणाम आपण तेव्हाच प्राप्त करू शकतो जेव्हा आपल्या मनात स्वर्गात प्रवेश करण्याची दृढ आसक्ती व निश्चय असेल आणि आपण तेथे जाण्याकरिता खरोखरच आतूर आहोत. अशा स्थितीत जिव्हेचे रक्षण आणि सत्यता आम्हाला आमच्या ध्येयापर्यंत पोहचवील आणि चहाडी आम्हाला यापासून दूर करण्यात यशस्वी होईल, तर मग आमच्या जिभेने वाईट गोष्टींसाठी कितीही प्रयत्न केला तरी आम्ही तिची लगाम आवळून तिला गप्प राहण्यास विवश करू. कारण पारलौकिक जीवनात कायमचे यश आणि उच्च स्थान प्राप्त करण्याच्या खऱ्या भावनेमुळे मानवात निर्माण झालेल्या शक्तीमुळे जिभेला तिच्यापुढे झुकावेच लागते. वास्तविकत: आमच्या निश्चयाची चिरफाड करून आमच्या ताब्यातून सुटून जाण्याची शक्ती जिभेत आहे, असे कदापि नाही. खरे तर आमच्या मनांत आपल्या पारलौकिक जीवनास निरंतर सुखी, समाधानी आणि आल्हाददायक जीवन बनविण्याची भावना फारच दुर्बल आहे. याच दुर्बलतेचा लाभ घेऊन जीभ आम्हाला पराभूत करण्यात यशस्वी होते. त्यामुळे इतर पापकर्मांपासून वाचण्याव्यतिरिक्त जिव्हेवर नियंत्रण राखण्याकरिता आणखी एक मार्ग हादेखील आहे की आमचा पारलौकिक जीवनावर दृढ विश्वास असायला हवा.

पारलौकिक जीवनावर दृढ श्रद्धा असणे म्हणजे मृत्युनंतरचे जीवन आणि स्वर्ग व नरक असण्यावर विश्वास असण्याबरोबरच स्वर्ग व नरकाचा विचार मनांमध्ये रुजला पाहिजे. मन व हृदयात त्यांची प्राधान्याने आठवण ठेवावी आणि कल्पनेच्या दृष्टीद्वारे त्यांना स्पष्टपणे पाहिले पाहिजे.

दिव्य कुरआन आणि हदीसग्रंथांमध्ये स्वर्ग व नरकाचे इतक्या मोठ्या प्रमाणात वर्णन करण्यात आले आहे की जर मानव त्या आयतींचे आणि हदीसींचे पठण करीत राहिला तर स्वर्ग व नरक त्यांच्या विस्तृत वर्णनासह बुद्धीच्या दृष्टीसमोर स्पष्ट होतात. खरे तर मानव ज्या गोष्टींवर लक्ष्य केंद्रित करीत राहील, त्या हळूहळू मनात दृढ होत जातात. त्यामुळे आम्ही दररोज आपल्या व्यस्ततेतून काही मिनिटे वेळ काढून एका बाजूला बसावे आणि जीवन कोणत्या वेगवान गतीने व्यतीत होत आहे आणि लवकरच एक क्षण येणार आहे तेव्हा अतिप्रिय असणारे स्नेही आपणास पांढऱ्या कपड्यात लपेटून जमिनीमध्ये दफन करतील, या सत्यतांवर सूक्ष्म चिंतन करावे. मग अनंत काळापर्यंत या कबरीत राहावे लागेल, जी एकतर 'स्वर्गातील बागांपैकी एक बाग असेल अथवा नरकाच्या खंदकांपैकी एक खंदक.'

यानंतर मग निवाड्याच्या दिवशी सर्व मृतांना उठविण्यात येईल आणि कर्मपत्र हातात दिले जातील. त्यात काय लिहिले असेल हे अल्लाहलाच ठाऊक. निंदा-नालस्ती, चहाडी, खोटे, टोमणे मारणे, धिक्कार करणे, अर्वाच्य वाणी, धोका, लालच, विश्वासघात, अप्रमाणिकपणा, धार्मिक निष्काळजीपणा आणि अल्लाह आणि अल्लाहचे पैगंबर मुहम्मद (स.) यांची अवज्ञा; अथवा सद्‌वर्तन, धर्माशी लगाव, सदाचार, कर्तव्यपरायणता, एकेश्वरनिष्ठा, इस्लामची सेवा आणि अल्लाह व अल्लाहचे प्रेषितांवरील श्रद्धा?

मग हिशोब घेतला जाईल आणि हिशोबानंतर एकीकडे सुखासमाधानाची एक बाग व आल्हाददायक जीवन असेल, ज्यातील कृपांना कोणत्याही डोळ्यांनी पाहिले नसेल, कोणत्याही कानांनी ऐकले नसेल, कोणत्याही मनामध्ये त्यांचा विचार आला नसेल अथवा दुसरीकडे अपमानकारक, कष्टदायक नरक असेल, ज्यात टाकण्यात आलेल्याची अशी स्थिती होईल की तो तिथे मरणारही नाही आणि जिवंतही राहणार नाही.

दररोज या तथ्यांना आपल्या कल्पनेच्या डोळ्यांच्या समोर आणून काहीकाळ त्यांचे सविस्तर निरीक्षण केले गेल्यास अल्लाहने इच्छिल्यास हे काम पारलौकिक जीवनावरील निष्ठेला शक्तिशाली बनवील, ज्यामुळे जिव्हेवर नियंत्रणच प्राप्त करणे सोपे होईल, इतकेच नव्हे तर आणखीन अनेक परीक्षांचा सामना करण्यात मदत मिळेल, अशी अपेक्षा आहे.

***- ० - समाप्त - ० -***